पोलीस दलात सेवेसाठी निवड करण्यात आलेल्या उमेदवारांच्या चारित्र्य व पूर्वचारित्र्य पडताळणी करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन परिपत्रक क्र.एमआयएस-०३०८/प्र.क्र.७०४/पोल-५अ
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२. दिनांक : १७ फेब्रुवारी, २००९.

वाचा : १) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.चापअ-१००१/प्र.क्र.११०/२००१/१६-अ, दि.२६ नोव्हेंबर, २००२
२) शासन निर्णय, गृह विभाग क्र.आरईएन-०३९९/सीआर-२०३/पोल-५अ, दि.४ जानेवारी, २००३
३) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.चापअ-१००८/प्र.क्र.५७/२००८/१६-अ, दि.३० सप्टेंबर, २००८.

**शासन परिपत्रक :-**

पोलीस दलातील सेवेसाठी निवड करण्यात आलेल्या उमेदवारांच्या पूर्वचारित्र्याची तपासणी व त्यासंदर्भातील पुढील कार्यवाही शासनाच्या सामान्य प्रशासन विभागाच्या शासन परिपत्रक दि.२६.११.२००२ नुसार करण्याच्या सूचना गृह विभागाच्या शासन निर्णय दि.४.१.२००३ नुसार देण्यात आल्या होत्या. सामान्य प्रशासन विभागाने शासन परिपत्रक दि.२६.११.२००२ नुसार साक्षांकन नमुना विहित केला होता. या साक्षांकन नमुन्यात सामान्य प्रशासन विभाग शासन परिपत्रक दि.३०.९.२००८ नुसार सुधारणा करण्यात आली आहे. सर्व पोलीस घटकांना सूचित करण्यात येते की, पोलीस दलात निवड झालेल्या उमेदवारांचे चारित्र्य व पूर्वचारित्र्य याची पडताळणी करण्यासाठी सामान्य प्रशासन विभाग शासन परिपत्रक क्र.चापअ-१००८/ प्र.क्र.५७/ २००८/१६-अ, दि.३०.९.२००८ नुसार विहित साक्षांकन नमुन्यात उमेदवारांकडून माहिती घेण्यात यावी. चारित्र्य व पूर्वचारित्र्य पडताळणीची कार्यवाही नियमानुसार करावी.

२. शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, पोलीस शिपायांच्या मुलभूत प्रशिक्षणादरम्यान एखादा उमेदवार वारंवार गैरहजर राहिल्यास अथवा एखाद्या उमेदवाराने गैरवर्तन केल्यास त्यास तीन वर्षाच्या आतील सेवा असल्याच्या कारणास्तव विभागीय चौकशी न करता तडकाफडकी नोकरीतून कमी केले जाते. अशा उमेदवारांविरुध्द नियमानुसार शिस्तभंगविषयक

कार्यवाही न केल्याने उमेदवारांकडून न्यायालयाकडे दाद मागितल्यावर अशा दाव्यांचे निकाल शासनाच्या विरोधात जाण्याची शक्यता लक्षात घेता यापुढे पोलीस शिपायांच्या मुलभूत प्रशिक्षणादरम्यान तसेच तीन वर्षाच्या आतील सेवेतील एखादा उमेदवार वारंवार गैरहजर राहिल्यास अथवा एखाद्या उमेदवाराने गैरवर्तन केल्यास नियमानुसार शिस्तभंगविषयक कार्यवाही पूर्ण करुन म्हणजेच विभागीय चौकशी करण्यात येऊन चौकशीअंती दोषी आढळल्यास व अशा उमेदवारास बचावाची पूर्ण संधी दिल्यानंतरच त्याच्याविरुध्द योग्य शिक्षा बजावण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( सदानंद जाधव )
उप सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रत,
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास प्रथके, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
अपर पोलीस महासंचालक, राज्य राखीव पोलीस बल, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
आयुक्त, राज्य गुप्तवार्ता विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सर्व विशेष पोलीस महानिरीक्षक,
सर्व पोलीस आयुक्त,
सर्व पोलीस अधिक्षक,
सर्व समादेशक,
सर्व प्राचार्य, पोलीस प्रशिक्षण विद्यालये,
निवडनस्ती (पोल-५अ)